# नरवीर तानाजींची शौर्य गाथा

श्री छत्रपती शिवाजी महाराजांना आणि त्यांच्या वीर सहकाऱ्यांना समर्पित








# गड आला पण नरवीर गेला











सध्याच्या भूदल, हवाईदल आणि नौदलातील तज्ज्ञ लष्करी अधिकाऱ्यांनी केलेली मांडणी





जगात अशा तऱ्हेची मोहिम फारच कमी वेळा आखली व फत्ते केली गेली असेल... इतिहासकारांनी या मोहिमेवर अनेक भाष्ये केली आहेत. 'गड आला पण सिंह गेला' या उक्तितून, पोवाडे व कहाण्यातून तानाजी मालुसरेंच्या जीविताच्या आहूतीची आठवण या चढाईच्या लढतीला उदात्त करून जाते...



# विडा उचलला....आधी लगीन कोंडाण्याचे....



# हे सादरीकरण करण्याचा उद्देश काय?

❖ महाराजांनी जी लढाई केली त्यातील चुका दाखववायचा उद्देश नाही.

❖ युद्धशास्त्रीय दृष्टीकोनातून आजच्या लष्करी अधिकाऱ्यांना जर आज्ञा मिळाली;

❖ तर त्या काळातील मर्यादा लक्षात ठेऊन ते ही मोहिम कशी नियोजित करतील आणि कशी पार पाडतील या प्रमेयावर खालील शोधकार्य आधारित आहे.

❖ लष्करी दलांना विविध अंगांनी विश्लेषण करून कसे नियोजन करावे लागते. पूर्वतयारी कशी करतात. प्रत्यक्ष पार पाडत असताना परिस्थितीनुसार कसे फेरबदल करावे लागतात. याची कल्पना यावी हा उद्देश आहे.

# मागे वळून पाहताना... मोहिमेची सुरवात व आखणी

- ❖यावर मेजर जनरल शिशिर महाजन म्हणतील...पुरंदरच्या तहामुळे शिवाजी महाराजांनी १४ जून १६६५ रोजी सिंहगड स्वतः उपस्थित राहून कीरतसिंहच्या हाती सोपवला.
- ❖राजगडावरून परिसराचा आढावा घेताना ३ फेब्रूवारी १६७० पर्यंत महाराजांच्या नजरेला सिंहगड खटकत होता. मोहीम ४ फेब्रुवारीच्या (माघ वद्य नवमीच्या रात्री) सुरू झाली.
- ❖ तानाजी मालुसरे महाराजांचे खंदे पंचहजारी पायदळ सरदार होते. त्यांनी या मोहिमेची जबाबदारी आपणहून घेतली. अनपेक्षित जागेतून मावळ्यांना नेऊन रातोरात हल्ला करायची अभिनव पण अत्यंत जोखमीची मोहीम त्यांनी आखली.

# सन 2024 मधील सिंहगडाची भौगोलिक स्थिती व गडावरील विविध वास्तूंचा ढोबळ निर्देश



# 1670 सालातील सिंहगडाची परिस्थिती



दि. ३/४ फेब्रूवारी १६७० रात्री, शुक्रवार,
(शके१५९१ सौम्य संवत्सर माघ वद्य नवमी)
नरवीर तानाजी मालुसरे आणि त्यांचे कनिष्ठ बंधू सूर्याजी मालुसरे आपापल्या बरोबर साधारण ५०० मावळ्यांसह सिंहगडाच्या पायथ्यापाशी सायंकाळी येऊन पोहोचले आहेत. त्यानंतरच्या घटनांवर आधारित हे सादरीकरण सुरु होते.



# नरवीर तानाजींचे दबा धरलेले जवान मावळे



# कलावंतिणीचा बुरूजाजवळच्या मैदानी भागातील शिपायांची ठाणी व तंबू, भोजनालये, पायखाने



# पाणलोटाची घळ आजही अशी दिसते



❖ अडोशाच्या घळीत ३ तास दुर्गंधी सहन करत नाक मुठीत धरून बसलले मावळे तानाजींची आज्ञा आल्यावर....
❖ दोरशिड्यावरून आलेल्या कंपनी 'अ' मधील तुकड्या २ व ३ कलावंतिणीच्या
❖ बुरुजावरील पेंगणाऱ्या सैनिकांना कापून काढतात ...

❖ दोणागिरी कडा, तिथून वर चढलेल्यांची लपायची जागा, व हनुमान गढी कडून वर चढायची जागा



# कारवाई सुरु कंपनी ‘अ’ ची तुकडी ( प्लाटून) 1 व 2 पहारेकऱ्यांचा सफाया करते

बालेकिल्याची संरक्षक भिंत

उदेभानाचा वाडा

बालेकिल्ल्याच्या बाहेरून लपत जाऊन १-२ तुकड्यांनी मुगलांच्या गस्ती पहारेकऱ्यांचा सफाया केला. हनुमान गढीला मोकळे केले.

# कंपनी ‘क’ पुढे सरकत चालली

शिड्यावरून चढून आलेल्या कंपनी ‘क’ ची कामगिरी

- तुकडी १ ने चौकी हनुमान गढीचा सफाया केला.
- २०० जवान चढून वर यायची वाट मोकळी केली.
- तुकडी २ ने झुंजार बुरुजाचे रक्षक खतम केले.
- तुकडी ३ ने तानाजींच्या टेहळणी केंद्राची स्थापना केली.

# कंपनी ‘अ’ तुकडी 1 ची कारवाई

विंड पॉईंट चौक्या

कलावंतीचा बुरूज चौक्या

- शिड्यावरून चढून आलेल्या कंपनी ‘अ’ ची कामगिरी
- कलावंतीणीचा बुरुज व विंडपॉईंटच्या चौक्यांचा सफाया केला. याच सखल भागात मुगल सैनिकांचे तंबू होते.

# कंपनी 'अ' - तुकडी 2 व 3 ची कारवाई



... पागेतील घोडे,बैल, अन्य जनावरांना रट्टे मारुन सैनिकांच्या तंबूंकडे पळायला लावले गेले... एकाएकी ‘भगदड’ निर्माण केली गेली. झोपेतील मुगलांना काय झाले ते कळायच्या आत तंबूत जनावरे घुसत आली...



# वैरणींच्या गंज्या आगीत भस्मसात

कंपनी अ च्या तुकडी २ ने जनावरांना रट्टे मारून पळवले. तुकडी ३ ने बरोबर आणलेल्या तेलबोळ्यांनी गंजीला आग लावली.

कंपनी अ च्या तुकडी ३ ने
पुणे दरवाजा कडील बालेकिल्ल्याच्या दरवाज्याला बाहेरून कडी लावून टाकली.






# दावणी तोडून सैरावैरा पळत सुटलेल्या जनावरांची तारांबळ

- अचानक दावणी तोडून सैरावैरा पळत सुटलेल्या जनावरांना तंबूत घुसण्याशिवाय पर्याय नसल्याने त्यांच्या पायदळी तुडवल्या जाण्यापासून बचावायला अंगावर जाड पांघरूणे घेऊन झोपलेल्या सैनिकांची तारांबळ उडाली.... घोडे, बैल, म्हशी एकदम अशी कशी सैराट आली? नक्की काय झाले? याचा उलगडा न झाल्याने भांबावलेल्या सैन्याला ...
- एकदम आगीचे लोळ वर जाताना पाहून तिकडे काय झाले पहायला धावले... अशा भांबावलेल्या सैन्याची मानसिकता लढायची न राहता समोरच्या गोंधळाला आवरावे कसे यावर होती...
- आता 'हर हर महाहेव' अशा रण गर्जना बालेकिल्ल्याच्या आतील सरदारांच्या कानावर येऊ लागली... अशा धुसपुशी अनेक वेगवेगळ्या तऱ्हेचे सैनिक जमले की आपापसात दंगे करतात असे वाटून सुरवातीला दुर्लक्षित केले असावेत...

# भिंत व घळ या सापटीतील चिकन नेक

- सुमारे २०० मावळे असलेली कंपनी ‘ड’ तोवर हनुमान गढीच्या बाजूने वर आली... जनावरांच्या सैराटीमधून, आगीच्या भयावह प्रकाराने दूर जायला पळत सुटलेले
- मुगल सैनिक एका बाजूला बालेकिल्ल्याची तटबंदी आणि दुसऱ्या बाजूला उतार असलेली घळ या सापटीत 'चिकन नेक' प्रमाणे अगदी चिंचोळ्या जागेत अडकले. त्यांना दाबून धरून....
- तास भर थोपवून धरून ठेवायला शक्य झाले. तोवर रात्रीचे ३ वाजून गेले होते...

# तानाजी कडा, पागा, देवटाके यातील चिंचोळ्यामार्गात तानाजींनी उदेभानाच्या घाबरून पळणाऱ्या सैनिकांना अडवले...






# कारवाई सुरु झाली कंपनी ‘ब’ ची

तानाजींनी नियंत्रण कक्षातून सुर्याजीच्या कुमकीवर नजर ठेवायला व उदेभानाला बालेकिल्यातून बाहेर काढायला उकसवले...

कल्याण दरवाजा क्र.१

कल्याण दरवाजा क्र.२

दरवाजे उघडायची तुकडी

उदेभानाचे थडगे

कंपनी ब ने दरवाजे फोडायच्या पाथरवट तुकडीला दिलेले सुरक्षाकवच दिले

कल्याण दरवाजे आतून उघडायच्या सर्वात महत्वाच्या कामाला सुरवात केली. तिथे हातघाई होऊन मुगल रखवालदारांनी प्रसंग ओळखून किल्ल्याचा जुडगा अंधारात तटाच्या बाहेर फेकून दिला.

कल्याण–कोंडाणापुर

## कोण शत्रू? आला कसा? किती सैनिक असावेत? वगैरे विचार करायला वेळ नसल्याने 'दीन दीन' म्हणत 'जसे जमेल तसे लढा' असा आदेश दिला गेला...!

- ❖ ... तिकडे बालेकिल्ल्यातील निवासस्थानात विश्राम करणाऱ्या उदेभानाच्या नोकरांना आवाज ऐकू आले. त्यांनी उदेभानाला उठवून सांगितले तसे ‘नंबर २’ कमांडर सिद्दी हिलालला उठवून काय झाले आहे ते पहायला आज्ञा केली... !
- ❖ त्याने कपडे सावरून, हातात शस्त्र घेऊन आपल्या शरीर रक्षकांसह तो आवाजाच्या दिशेने निघाला. पण बाहेरून दरवाजा बंद केला आहे हे त्याच्या लक्षात आले...
- ❖ काही तरी नक्कीच गडबड आहे हे त्याने ताडले...आपल्या सैन्याला 'आतून सगळ्यांनी लढायला सज्ज राहा' म्हणून ओरडून ओरडून आदेश द्यायला सुरवात केली...!

# कल्याण दरवाजा आतून फोडून उघडायची वेळ आली




- कंपनी 'ब' आपल्या बरोबरच्या ५० जणांच्या दरवाजे फोडायची हत्यारे घेऊन कल्याण दरवाज्याकडे निघाले.
- त्यांच्या कामात अडथळा आणणाऱ्यांचा खातमा करायला १०० जणांची सुरक्षा कवच तुकडी होती.
- दरवाजा खिळखिळा झाला की जोर लावून खेचून काढायसाठी ते सज्ज होते...!

# घणावर घण पडत राहिले.

- ...पहिला दरवाजा अपेक्षेपेक्षा जास्त वेळ खाऊन उघडेना. कारण तिथल्या देवडीवरच्या गस्ती शिपायांनी रागरंग पाहून किल्लीचा जुडगा अंधारात किल्ल्याच्या बाहेर दूर फेकून दिला...!
- आता दरवाजा तोडल्याशिवाय पर्याय राहिला नाही... !
- ... घणावर घण पडत राहिले.
- पण ते अजस्त्र अवजड दरवाजे तुटेनात....!



# तानाजींच्या सैन्याची घालमेल !

... तानाजींना काय घडते आहे याची माहिती देणारे हलकारे आगीची बातमी देऊन बराच वेळ झाला. त्यांचे दहा अंगरक्षक, जादाची शस्रे सांभाळणारे बालेकिल्ल्याचा दरवाजा केंव्हा उघडतोय यावर अंधारात बसून लक्ष ठेवून होते...

❖ कारण उदेभानाचे आत राहणारे सरदार इकडून बाहेर पडून आपल्या सैनिकांना लढायला एकत्र करायला बाहेर येतील. तेव्हा त्यांना मारायला कंपनी ‘ब’ तयार होती.

❖ मात्र सुर्याजींची ५०० मावळ्याची कुमक आल्याशिवाय ही मोहिम एकतर्फी होऊन कुठल्याही क्षणी मुगलांच्या बाजूने हाताबाहेर जाण्याची शक्यता होती...!

❖ दरवाजे किती झटपट तोडून सुर्याजींना आत यायला जमेल यावर लढाईचे सर्व भविव्य ठरणार होते...!

❖ हे तानाजी मनोमन जाणून होते...!

# कल्याण दरवाज्यांच्या बाहेरची परिस्थिती

❖ ...सुर्याजी आपल्या ५०० मावळ्यांच्या ३ कंपन्यांसह कल्याण दरवाज्यापासून ५ मिनिटांच्या अंतरावर लपून राहिला होते. अतिशय अरूंद उताराच्या जागेतून दरवाजा उघडायची वाट पहात बसला होता. आत आपल्या सैन्याला मदतीसाठी झटपट गेल्याशिवाय १२ ते १५ शे सैनिकांसमोर तानजींच्या ५ शे मावळ्यांचा टिकाव लागणार नाही हे तोही जाणून होता...!

❖ दरवाजा अचानक उघडला तरी ताबडतोब घुसणे धोक्याचे होते. कदाचित तानाजीला मारून मुगल सैन्याने आणखी कुमक कल्याण दरवाज्याबाहेर वाट पहात असेल असे ताडून ते आपल्यावर आक्रमण करू शकतात. म्हणून ते सावध होते..!

# कल्याण दरवाजा उघडेना तेंव्हा....!

❖ अनेकांच्या हृदयाचा ठोका चुकला. आता दरवाजा उघडला गेला नाही तर आपण जीवंत परतत नाही...
❖ या विचाराने मावळ्यांच्या मनात वेगवेगळे विचार चमकून जायला लागले.
❖ समजा पळायची वेळ आली तर लटकलेले दोर किती दूर असतील?...
❖ आता ते शाबूत असतील का?
❖ ... घरची कामं, नात्याची लोकं आठवत आठवत
❖ आता इथेच संपणार या कल्पनेने शहारे येऊ लागले...!

# तानाजींचे वीरोत्साही संभाषण...!

- ... वीर सेनानी शिपायांच्या मनातील भाव ओळखतात. तानाजींनी रागरंग पाहून खणखणीत शब्दात आपल्या सहकाऱ्यांना उद्देशून म्हटले...
- 'शूरांनो, आता वेळ आली आहे, वीर मरणाची. मग जिंकून का नाही मरायचे? या मुलखा बाहेरच्यांना आपण लाचारीने का मुजरे करायचे? आपल्या महाराजांना आगऱ्यात नेऊन मारायला उठलेल्यांना मारून विजय मिळवायची ही संधी आहे....!
- मी ओळखतो त्यांना. अजिबात घाबरु नका तुम्ही... मी आहे ना तोवर कोणी तुम्हाला मरू देणार नाही... कळ काढा... आत्ता दरवाजा उघडला की सुर्या आपल्याला मिळेल'...!

# ‘हर हर महादेव’ दरवाजा उघडला...!

- ... आणि तेवढ्यात हलकाऱ्यांनी बातमी आणली की पुढचा दरवाजा नीट बंद होत नव्हता तो लगेच उघडला.
- आपल्या लोकांनी तुताऱ्या वाजवून,
- 'हर हर महादेव'
- गर्जनेने गडाच्या आसमंतात अनेक प्रतिध्वनी उमटत राहिले...!
- ... सगळ्यांना एकदम हुरुप आला...!

हर हर
महादेव....

सुर्याजींच्या ५०० सैन्याच्या गमनाने चिंतित मराठ्यांना त्वेषाने लढायचा हुरुप आला...

# बालेकिल्ल्याच्या दरवाज्याबाहेर दबा धरुन...

❖एका मागे एक करत ५०० जण गडावर यायला तास भर लागला. आपल्या बरोबर आलेल्यांपैकी लढताना किती उरले किती गेले याचा अंदाज करणे तानाजीं अवघड होते.

❖चंद्र मावळला. आता पहाटेचे ४ केंव्हाच वाजून गेले होते.

❖सुर्याजींचे ३ कंपनी कमांडर बालेकिल्ल्याच्या दरवाज्यापाशी घात धरून सज्ज होते.

❖पण तो दरवाजा आतून उघडत नव्हता...!

# सुर्याजींचे 500 सैनिक कल्याण दरवाज्यातून आत येऊन बालेकिल्ल्याबाहेर उदेभानची वाट पहाताना…













# उदेभानाला पडलेले पेच....!

- ❖उदेभानला सुचत नव्हते. शिवा इतके साहस करून रात्री कसा येऊ शकतो?... तो हा गड जिंकायला कधीही येणार असे आपल्याला माहित असून आपले लोक रात्रीला आग पाहून घाबरले?... आता मला बालेकिल्ला सोडता काम नये...!
- ❖कारण मी जर पकडला गेलो तर आपला पराभव झाला असे होईल....!
- ❖सिद्दी हिलालकडून कुठलीच खबर चांगली येत नाही...! जनावरांची वैरण खाक झाली. घोडे बिथरले, तंबूत ठेवलेली शस्त्रे जनावरांच्या दाटीमुळे, पायदळी तुडवल्याने हाती येईनात...!
- ❖गोंधळलेल्या सैनिकांची चूक नाही....!
- ❖आपल्याला आता ठपका सहन करायला लागणार...!

'मी असा लपून बसू शकत नाही!' म्हणून उदेभानाने विचारांती आपल्या दहा अंगरक्षकांना तयार राहा. म्हणत शस्त्र उचलले. दरवाजाबाहेर मरण उभे आहे हे त्याला माहित नव्हते!



# मशालींच्या प्रकाशात उदेभान राठोड



प्रातिनिधिक उदेभान  राठोड़






तानाजी मालुसरे

- ...दरवाजा उघडला... मशालींच्या प्रकाशात टेकाडावरून तानाजींनी निरखले 'हाच तो उदेभान'...!
- ... आगऱ्याला महाराजांबरोबर जाताना आपल्याला त्याने जयसिंहाच्या सरदारांची ओळख करुन दिली होती...!
- तानाजी हातात ढाल तलवार घेऊन सावकाश खाली उतरायला लागले...!

# तानाजींसमोर उदेभान आला....!

ज्याला मारून गड जिंकायचा त्याला बाहेर काढायला यश मिळाले
तानाजीची खात्री झाली की तोच उदेभान...!



- तानाजी हातात ढाल तलवार घेऊन सावकाश खाली उतरायला लागले...!
- तोवर उदेभानाच्या १० अंगरक्षकांवर झडप घालून सूर्याजींच्या शूरांनी गारद केले...! आपले रक्षक असे अचानक कोसळलेले पाहून...
- भीषण समराची नांदी आहे म्हणत तो पुढे येत राहिला...! मशालीच्या अंधुक प्रकाशात .... तानाजीं समोर उदेभान ठाकला...!!

# दोघे समोरासमोर ठाकले...!

- उदेभानाला कोण समोर आहे याची खात्री नव्हती...! बोलते करत बेसावध करायची खेळी त्याने केली... 'सिवा तो नही?'
- ... तो हिंदुस्तानीत काय म्हणाला याचा अंदाज घ्यायला वेळ मिळावा म्हणून तानाजींनी आपल्या अंगरक्षकांना म्हटले, ‘तो काय म्हणतो रे...?’
- “'काय की, पण त्याला तुम्ही शिवाजी महाराज वाटताय बहुतेक... !'

अचानक समोर आलेला शिवाजी तर नाही
असे वाटून
“तुम कौन? सिवा?” ...
“मी ‘ताना...
तुला मीच पुरेसा आहे”...



तानाजींनी उदेभानाला गाठायची जागा

# तलवारीच्या हातघाई कसबाची प्रतिष्ठा पणाला लागली.

- ... दोघांच्या तलवारी एकमेकांशी भिडल्या.
- मराठ्यांच्या तलवारबाजींच्या सरावाचे डाव
- उदेभानाला चकित करत राहिले.



- पाहता पाहता दोघांच्या शरीरावरचे कपडे रक्ताच्या रंगात माखले.
- उदेभान एकटा पडला होता. तरीही तो त्वेषाने वार करत होता.
- त्या दोघांच्या मधे पडायची हिम्मत कोणाला होईना...!

# तानाजींच्या आवेशासमोर उदेभान टिकेना

- आता उदेभानाने पवित्रा बदलला... आपल्या हा आटपत नाही म्हटल्यावर त्याने उजव्या ऐवजी डाव्या हातात तलवार धरून ढाल उजव्या हातात घेतली.
- हात बदलून वार करायचा सराव आता त्याचा अशा ऐन वेळी कामाला आला...!
- तानाजींनी उजव्या हाताने लढणाऱ्यांशी केलेल्या सरावामुळे आता त्यांचे आडाखे चुकायला लागले...!

# ऐनवेळी ढालीच्या मुठीचे बंद ढिले पडले...!!

❖ उदेभानाने केलेला जोरदार घाव ढालीवर झेलताना ढालीचा बंद ढिला पडला... ती मुठीत धरूनही लडबडायला लागली...!

❖ 'अरे दुसरी ढाल आणा रे'... म्हटल्यावर नवी ढाल आणे पर्यंत लढ्याचा रंग बदलला होता...!!

❖ तलवारीचा घाव डाव्या हातावर कोसळल्याने तानाजींचा डावा हात जबर जखमी झाला.

❖ढाल मिळूनही ती धरायचा त्राण राहिला नाही. ते तोल जाऊन बसले...!!!

# सूर्याजी आले मदतीला...!!

- उदेभानाने हीच संधी गाठून डोक्यावर भीम घाव घालायला दोन्ही हातांनी तलवार उचलली... !
- ... मागून अंगरख्याला मानेच्या जवळ धरून एका हाताने खेचले. म्हणून तो जबरी वार हुकला...!
- 'तू कौन?' म्हणत उदेभानाने चमकून मागे पाहून विचारले...
- 'मी सुर्या... ! त्याचे दुर्लक्ष झालेले पाहून क्षणात तानाजींनी उठून जोरदार प्रहार करत उदेभानाला पाडला...! पण पडताना त्याच्या डाव्या हाताने केलेला वार छाती वरून चिरत गेला...
- दोघेही वीर अती श्रमाने घायाळ झाले. सूर्याजींनी भावाला मदत करायला हात पुढे केला...!!
- तेंव्हा तानाजी म्हणाले, 'तो काय जगत नाही...!!!'

# तानाजींना वीरगती प्राप्त झाली...!

- ‘तू त्यांच्या सरदाराला दाखव उदेभान मेलेला'...
- ‘त्यांना शस्त्रे टाकून शरण या’ म्हणून कबूल करून गड खाली करायला लाव... !
- ‘मला इथुन बाजूला काढा... मला जमेल तसे मी पहातो..!’
- उदेभानाचा प्राण तोवर मावळला... !!
- तानाजींच्या अंगरक्षकांनी अतिहळुवारपणे त्यांना सुखरूप ठिकाणी नेले. पण तोवर फार रक्त गेल्याने ग्लानी येऊन
- तानाजींचे प्राणोत्क्रमण झाले...!!!
- मुगल सैन्याने शरणागत होऊन जनावरे, शस्त्रे, पैसा-अडका, टाकून गड खाली केला..!

# जाळ करुन महाराजांना इशारा गेला...!

- मुगल सैनिकांनी शरणागत होऊन पुणे व कल्याण दरवाज्यातून पलायन केले...
- मागे टाकलेली शस्त्रे, जनावरे, यातून वाट काढत मोठा जाळ केला गेला...
- तिकडे राजगडावर शिवाजी महाराजांना जिंकल्याचा इशारा मिळाला.

# महान योध्याचे स्मरण

## तानाजींची समाधी



## नरवीर तानाजी मालुसरे



# यशवंती घोरपडी बद्दल ऐकतो त्याचे काय?



दादा पांचाळ यांची पाळीव घोरपड



- घोरपड जास्तीत जास्त लांबी पाच फुटापर्यंत असते. तिचे वजन शंभर किलोपर्यंत असते. घोरपडीचे डोके धडाला एका मणक्याने जोडलेले असते. तिच्या शरीरावर बाह्यत्वचा कठिण व जाड असते.
- लहरी प्राणी. त्यावर विसंबून कोणतेही नियोजन करणे धोक्याचे. पोत्यात भरून तिला ४५ किमी राजगडापासून उचलून आणणे, अंधारात ती कुठे जाते ते माहित नसणे वगैरे कारणांनी ती उपयुक्त नाही.



# 1. मागे वळून पाहताना...
# मोहिमेची सुरवात व आखणी

यावर मेजर जनरल शिशिर महाजन म्हणतील...पुरंदरच्या तहामुळे शिवाजी महाराजांनी १४ जून १६६५ रोजी सिंहगड स्वतः उपस्थित राहून कीरतसिंहच्या हाती सोपवला.

- ❖ राजगडावरून परिसराचा आढावा घेताना ३ फेब्रूवारी १६७० पर्यंत महाराजांच्या नजरेला सिंहगड खटकत होता. मोहीम ४ फेब्रुवारीच्या (माघ वद्य नवमीच्या रात्री) सुरू झाली.
- ❖ तानाजी मालुसरे महाराजांचे खंदे पंचहजारी पायदळ सरदार होते. त्यांनी या मोहिमेची जबाबदारी आपणहून घेतली. अनपेक्षित जागेतून मावळ्यांना नेऊन रातोरात हल्ला करायची अभिनव पण अत्यंत जोखमीची मोहीम त्यांनी आखली.

# २. शिवाजी महाराजांचे नियोजन कामगिरी तानाजींची

१. अनुक्रमे “अ” व “क” कंपनीने कड्याच्या दोन टोकावरील व आतल्या पहारेकऱ्यांवर हल्ला करणे.

२. त्याआधी कमीतकमी ३०० मावळे कडा चढून सज्ज हवेत.

सल्लागार समितीत येसाजी कंक, मोरोपंत पिंगळे आणि शेलार मामा यांचा समावेश



३. उरलेल्या “ब” कंपनीने आपल्याबरोबरच्या ५० जणांना कल्याण दरवाजा आतून उघडायला रक्षण व मदत करणे. उदेभानाला बालेकिल्लयातून बाहेर काढून मारणे.

# ३. तानाजी मालुसरे यांनाच या मोहिमेचे नेतृत्व का दिले गेले?

- ❖लेफ्टनंट जनरल दत्तात्रय शेकटकरांना हा प्रश्न विचारला तर ते काय उत्तर देतील?
- ❖तानाजींना सिंहगडाची खडानखडा माहिती होती.
- ❖पायदळाचे सरदार असल्याने तानाजींकडे खडे एक हजार सैनिक उभे करायची ताकद होती.
- ❖तानाजींना उदेभानाचा चेहरा व कदकाठी आधीपासून पाहून माहित असावेत. कोणाला नक्की मारायचे आहे फार महत्वाचे ठरते.
- ❖आणि सर्वात महत्वाचे की शिवाजी महाराजांचा त्यांच्यावर अत्यंत विश्वास होता.

# 4. बहिर्जींच्या माहितीचे संकलन कसे असते सांगतील ले. जनरल राजेंद्र निंभोरकर

- ❖ बहिर्जींच्या हेरांमार्फत काढलेली माहिती - सैन्यसंख्या, टेहळणी बुरुजांवरील पाळ्याबदल आणि पहारेकऱ्यांची ठिकाणे व संख्या, नवी बांधकामे...
- ❖ कल्याण गावच्या बाजूच्या ३ दरवाजातील रक्षकांची संख्या कमीत कमी ३०. आतून कडीने बंद न होणारा पण झाकणारा नादुरुस्त दरवाजा क्रमांक २.
- ❖ पुणे दरवाजा बाजूचे सर्व आतून लाकडीदाटण्या, ओंडक्याने मजबूत बंद.
- ❖ फितवून दोरशिड्यांची व कासऱ्यांची सोय जनावरांकरता आहे असे सांगून करता येणे शक्य.
- ❖ गडाच्या घेराला बाहेरील सुरक्षाकडे पुर्वी पासून वहिवाटीच्या स्थानिक मावळ्यांना सोन्याचे कडे देऊन आपलेसे करता येईल. काही कारण नसल्यास मेटकरी २ आठवड्याला हजेरी. एकूण १५ ते २० लोक गस्त घालतात.
- ❖ कलावंतिणीचा आणि झुंजार बुरूज (सध्याची नावे) यामधे विविध सरदारांच्या सैन्य तुकड्या साप्ताहिक दोन पाळ्यात तटाच्या आतून २ जणांच्या रात्रपाळीच्या ४ नव्या गस्ती चौक्या तयार केल्या आहेत.
- ❖ सरदारांच्या घराला सदैव ३ पहारेकरी हजर असतात.
- ❖ रात्रीपाळीत सैनिक कमीत कमी ५० ते ७०. रात्री २ नंतर बहुधा गाफिल.

# 5. तानाजींनी मोहिमेसाठी काय तयारी केली होती?

लेफ्टनंट जनरल वेंकी पाटील यावर काय म्हणतील... तानाजींना पाहणीत दिसले की..

- जंगलात वाघ गेल्या काही हप्त्यात दिसलेला नाही.
- रात्री हरणे, सशांच्या मागे तरस, कोल्हे फिरतात. फेकलेले उष्टे अन्न खायला रानटी कुत्री, डुकरे येतात.
- फासेपारध्यांना कामाला लावून त्यांच्या कडून नाग आणि सापाची वारुळे, मुंग्यांच्या घराचे मातीचे डोंगर, गांधीलमाशांची पोवळी यांचा शोध करून ती नाहीशी केली.
- कारवी, घाणेरी या बोचऱ्या, खाजऱ्या झुडपांची तोडणी केली.
- घोडेपागेवाल्यांकडून माहिती काढली. उदेभान सध्या कसा दिसतो? काय पोषाखवात असतो? त्याचे अंगरक्षक किती? व कोण?

# ६. घेयाच्या प्रत्यक्ष पहाणी

मिलिटरी कमांडर (तानाजींच्या) प्रत्यक्ष पहाणीतील मेट्याच्या घेऱ्याच्या लोकांतून नोंदी कशा ठेवतात ब्रिगेडियर हेमंत महाजन म्हणतील..

❖ गडावरील उदेभानाच्या मुगल सैनिकात लक्षणीय वाढ झाली आहे. औरंगजेबाशी करार मोडल्याच्या बातम्यांमुळे ते अती सावध असतात.

❖ जनावरांना, कडबा वगैरे बांधायच्या बहाण्याने पाठवलेले दोरांचे बिंडे गडावर गेले आहेत.

❖ ते दोर कड्याच्या बाजूने असलेल्या बळकट खडकांना, झाडाच्या बुंध्यांना बांधायला व रात्री अंधारात खाली दोर टाकलेले दिसावेत म्हणून पांढरे कापड घेऊन आपल्यातील ४ पैकी २ जण वर गेलेत. उरलेले जाण्याच्या तयारीत आहेत.

❖ रात्री अनेकदा बुधल्यातील तेल संपून चौक्यात अंधार असतो. येत्या काही दिवसात कलावंतिणीच्या बुरुजाजवळच्या पटांगणात काही नायकिणींना नाचवणार आहेत.

# ७. तानाजींची अंतर्गत तयारी

नेव्हीतील कमोडोर  श्रीकांत देशमुख सांगताना म्हणतील...

❖महाराजांच्या आज्ञेप्रमाणे कामगिरीसाठी लागणारी शस्त्र - सामुग्री, सैन्यबळ आणि साधनसामुग्रीचा आढावा.

❖ ११०० तलवारी मुठी, म्याने, धार लावून तयार, वाद्या तपासलेल्या ढाली तयार आहेत.  वाखाचे दोरखंड, नाडेवाल्या दोराच्या शिड्या,चकमकीचे दगड, धूर करणारा नवसागर, गवत पेटवायला तेलात बुचकळलेले पलिते, जखमींना पट्टी, निरगुडीचा पाला, लेप तयार आहेत.

❖  सैन्याचा हजेरीपट सोबतच्या सरदारांच्या तुकड्यांची मोजदाद झाली.

❖राजगड ते सिंहगड वाटेत लग्नाचे वऱ्हाड जाणार आहे अशी आवई पिकवली आहे.

❖  गावकऱ्यांतील वाट दर्शक व गडावरील दिवसाकाम करणारे साथिदार मिळवले.

# ८.“दोणागिरीचा कडा” याच ठिकाणहून वर चढायला का निवड करण्यात आली?

❖ लेफ्टनंट जनरल सतीश सातपुते यावर भाष्य करताना म्हणतील..

❖ दोणागिरीकड्याबाजूच्या दरीकडून चढून येण्याला कठीण होता म्हणून हा भाग उदेसिंहाच्या सेनेने दुर्लक्षिलेला होता.

❖ चढून गेल्यावर लपायला सोईचा खोलगट भाग होता. हनुमानगढीतून उरलेले सैनिक चढवणे सोईचे होते.

❖ अंधुक चंद्रप्रकाशात कामगिरी पार पाडायला व रात्रीचे किती वाजले याचा अंदाज यायला सोईचा होता.

❖ कल्याण दरवाज्याकडे जायला सोईचा मार्ग होता.

❖ शत्रूच्या सैन्याला अडवायला चिंचोळा पट्टा होता.

# ९. टाईम (वेळ) आणि मोशन (गती) चे महत्व काय? त्याचा गड चढायला उपयोग केला गेला होता का?

- ले. जनरल संजय कुलकर्णी ज्यांनी सायचीन पहाडी १९८४साली काबीज केली होती. ते गणिताच्या आधारे म्हणतील...
- युद्ध हे 'गती आणि वेळ' या दोन पायांवर उभे असते. त्यात पराक्रम, शस्त्रे, नव नवीन युद्धप्राविण्य, डाव-प्रतिडावपेच यातून ते जय आणि पराजय या लंबकावर हेलकावते. चढायला लागणारी उंची १५ मीटरच्या आसपास धरली तर सुरवातीला वरून सोडलेल्या २ दोरशिड्यांवरून २० मिनिटात १० जण दोणागिरी चढून जायची गती शक्य असेल तर
- पहिल्या तासात ६० जवान तर पुढील ३ तासात  दोरशिड्यांची संख्या ६ पर्यंत वाढवून ताशी ९० जवान असे २७० + ६०=३३० वर जाऊ शकले तर पुढच्या भागाची आखणी केली जाईल.
- उरलेल्या २०० सैनिकांनी हनुमान गढी सर केल्यावर झुंजार बुरुजाची 'चिकन नेक' वाट चढून वर यायचे आहे.

# 10. रात्री २ नंतरची वेळ का निवडली? अमुक वाजले हे कसे काय ठरले?

- एयर मार्शल भूषण गोखले यावर मार्मिक उत्तर देतील..
- २ ते ४ ही गाढ झोपेची वेळ असते.
- हातात आत्तासारखी घड्याळे नाहीत. अशा परिस्थितीत वाजले किती हे ठरवणे कठीण... म्हणून हल्ल्याची वेळ चंद्राच्या गती व दिसण्यावरून ठरवावी लागली असेल.
- अष्टमीच्या रात्रीचा चंद्र १२ नंतर डोक्यावर येतो. तो दोणागिरी कड्याच्या बाजूला दिसायला लागला की तोवर आपले २०० सैनिक वर पोचले तर समजायचे की आणखी १०० वर गेले की हल्ला करायला सुरवात करायची.
- त्याआधी तेलाच्या बुधल्या, चकमकीचे दगड, कापसाचे बोळे, जादाच्या तलवारी, ढाली, दरवाजे फोडायला पहारी, घण, मोठे हातोडे, करवती, सामान वर आले पाहिजे.
- डोळ्याला चष्मा, दुर्बिणी नाहीत, पटकन आग लावायला लायटर किंवा आगपेट्या नाहीत. याचे भान आजच्या कमांडरांना राखले पाहिजे.

# 11. मिलिटरी कमांडर तानाजींचे आपल्या सैनिकांना आदेश कसे असतील?

- एयर मार्शल सुनीत सोमण म्हणतील...
- हे मावळ्या शूरांनो आपल्याला कोंढाण्याला आपल्या राज्यांच्या मुखत्यारीत परत आणायचे आहे.
- सुर्याजीची आपल्याला कल्याण दरवाजाकडून कुमक मिळवण्यास ते तीन दरवाजे आतून उघडायला आपण कड्याच्या बाजूने हिकमतीने वर जायचे आहे. आपण एकूण हजारापेक्षा कमी असलो तरी १५०० पेक्षा जास्त शत्रूला भारी आहोत.
- उदेभान ठार झालाच पाहिजे.
- येत्या अष्टमीच्या आधी सर्वांनी गटागटाने राजगडावरून कूच करून घेराच्या खालच्या वस्तीपाशी जमायचे आहे. तुकडीच्या हवालदारांनी किती जण जमलेत याची नोंद देणे.
- गडावरचे लोक खाली उतरले की अंधार व्हायच्या आत दोन्ही बाजूच्या मावळ्यांनी लपून राहाणे.
- वरून दोर खाली आले तर ते पकडून त्यांना आपल्या कडील दोर बांधून जादा व चढायच्या वाटा तयार करणे.

# 12. धूर्त युद्ध तंत्र म्हणजे काय?
# या लढतीत ते कसे उठून दिसते?

स्टाफ कॉलेजचे आर्मी विभाग मुख्य मेजर जनरल अमरदीप भारद्वाज यावर अभ्यास करून म्हणतील..

- मॅनूव्हर वॉरफेयर (Manoeuvre Warfare) किंवा मराठीत सुटसुटीत नाव 'धूर्त युद्ध तंत्र'. ते विविध घटकांतून साध्य होते.
- त्यांनी जगातल्या नामी मिलिटरी कमांडराच्या लढायांचा आढावा घेऊन शिवाजी महाराजांना (१० पैकी १० गुण देण्याची प्रथा नाही म्हणून) १० पैकी ९ मार्क देऊन प्रथम क्रमांकाने गौरवले आहे.
- या लढतीत त्यांच्या विचाराने - धक्कातंत्र, गोंधळ उडवणे, चकवणे, लपून मोठा हल्ला करून लढा जिंकणे या चारही तंत्रांचा वापर केला आहे.

# विंग कमांडर शशिकांत ओक




- यांनी नरवीर तानाजी मालुसरे यांच्या सिंहगड लढ्याचे लष्करी अधिकाऱ्यांच्या नजरेतून सादरीकरण करण्यास सुरवात केली.
- त्यानंतर विशाळगडाजवळच्या पावनखिंडीतील लढा,
- लोणावळ्या जवळच्या कुरवंडे घाटातील उंबर खिंडीतील नाट्य,
- सुरतेच्या किंमती सामानाचा संभार घेऊन परत येत असताना कांचनबारीतील हुलकावणी,
- अफ़ज़लखानाची उलटवलेली बाजी,
- लाल महालावरील सर्जिकल स्ट्राईक,
- अशा शिवाजी महाराजांनी ज्या लढायात स्वतः नेतृत्व केले त्यांचे सादरीकरण केले आहे.
- मो.क्र. : 9881901049

# लढा पावनखिंडीतला



लाख मेले तरी चालतील
पण लाखांचा पोशिंदा
मरता कामा नये...

स्वामी कार्याला समर्पित
वीर बाजी प्रभू देशपांडे




भाग १
₹ ५०




सादरीकरण -
विंग कमांडर
शशिकांत ओक.
(९८८१९०१०४९)

# लाल महलपर शिवाजी महाराज की सर्जिकल स्ट्राईक






# पुरंदरचा तह

भाग 1




# उंबरखिंडीतील नाट्य



करतलबखानाचा उतरला नक्षा -
अंबे नळीतील शरणागती - भाग 1.



# प्रतापगडाची उलटवलेली बाजी

## भाग ४ अफ़ज़लखान निघाला विजापुरहून

# सूरतवरून मौल्यवान सामान घेऊन परतताना

## भारवाहक भाग १

# आग्र्याहून सुटका



जीव वाचला म्हणून महाराज खुष होते.



शहाजहां वारला म्हणून औरंगजेब खुष होता.

# पेडगावचा शहाणा

दख्खनचा सुभेदार
बहादुरखां कोकलताश

'शोले' सिनेमातील अंगरेज जेलर शेखी मिरवतो नंतर फजिती पावतो. याची आठवण ताजी होते.








सध्याच्या भू सेना, नौसेना, वायुसेनेच्या तज्ज्ञ लष्करी अधिकाऱ्यांनी केलेली मांडणी